**कृती आराखडयाची प्रभारी अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने नगर विकास विभागात सल्लागार समितीची स्थापना**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य क्रीडा व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र.अपंग-२००२/प्र.क्र.४०२/सुधार -३**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :- १४ नोव्हेंबर, २००२**

**पहा :- (१)** अकआ/कृती आराखडा/०१.०२/का-१६/६१७, दि.१/३/२००२
**(२)** अवि/कृती आराखडा/०२/का.१६/५११, दि.१२/२/२००१

**प्रस्तावना :-** अपंग व्यक्ती (समान संधी , हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ हा फेब्रुवारी, १९९६ पासून अंमलात आलेला आहे. या कायद्यातील तरतुदींची प्रभाविरित्या अंमलबजावणी करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने अपंग कल्याण कृती आराखडा २००१ तयार केलेला आहे. सदर कृती आराखडयाचा कालावधी ५ वर्षाचा ठरविण्यांत आलेला असून तो १० व्या पंचवार्षिक योजनेंतर्गत प्रामुख्याने राबवावयाचा आहे. अपंग व्यक्तींची लोकसंख्या व उपलब्ध स्त्रोत लक्षात घेऊन त्यांचे जीवन सुसहय व्हावे यासाठी आवश्यक असलेल्या गरजा, अपंग व्यक्तीचे शैक्षणिक व आर्थिक आरोग्यविषयक पुनर्वसन करण्यासाठी आराखडयाची विभागवार विभागणी करण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-** महानगरपालिका/नगरपरिषदा क्षेत्रातील तसेच अपंग व्यक्तींना सार्वजनिक व इतर ठिकाणी प्रवेश मिळणे सोईचे व्हावे या दृष्टीने त्यात आवश्यक ते बदल केंद्र शासनाच्या सूचनेनुसार करण्याबाबत विचार करावयाचा असल्याने, शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार नगर विकास विभागातील आराखडयामध्ये ठरवून दिलेल्या कामाची अंमलबजावणी करण्यासाठी /सल्ला देण्यासाठी खालील समितीची स्थापना करण्यात येत आहे--

| | | |
|---|---|---|
| (१) | प्रधान सचिव, नगर विकास विभाग | अध्यक्ष |
| (२) | प्रधान सचिव,सा.न्या.का.क्रि.व वि.स.विभाग | सदस्य |
| (३) | सचिव, सा.बां.विभाग (रस्ते) | सदस्य |
| (४) | सचिव, सा.बां.विभाग (इमारती) | सदस्य |
| (५) | महासंचालक, आरोग्य सेवा संचालनालय | सदस्य |
| (६) | आयुक्त, अपंग कल्याण | सदस्य |
| (७) | मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| (८) | संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| (९) | आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे | सदस्य |
| (१०) | पोलीस महासंचालक, वाहतूक शाखेचे प्रभारी अधिकारी | सदस्य |
| (११) | संचालक, महाराष्ट्र राज्य आर्कीटेक संस्था | सदस्य |

(१२) संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई सदस्य-सचिव

(१३) श्री.सुभाष दातरंगे/डॉ.कल्याणी मांडके/सेंट्रल इन्स्टीटयूट ऑफ रोड ट्रान्सपोर्ट, पुणे/स्पास्टीक सोसायटी ऑफ इंडिया, बांद्रा, मुंबई/फेलोशिप ऑफ फिजीकली हँडीकॅप, हाजीअली, मुंबई सदस्य

**०२.** या समितीची बैठक किमान तीन महिन्यातून एकदा घेतली जाईल.

**०३.** या समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे :-

**१)** अडथळा विरहित मुक्त संचार व्यवस्थेच्या दृष्टीकोनातून विकास नियंत्रण व इमारत नियमावलीमध्ये सुधारणा करण्याच्या दृष्टीने नियोजनबध्दरित्या समय-बध्द आढावा घेणे.
**२)** विकास नियंत्रण व इमारत नियमावलीमध्ये अडथळा विरहित मुक्त संचार व्यवस्थेसाठी समयबध्द सुधारणा करण्याच्या सूचना करणे.
**३)** राज्यातील अडथळा विरहित मुक्त संचार व्यवस्थेच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे.
४) अडथळा विरहित मुक्त संचार व्यवस्थेच्या अंमलबजावणी कार्यक्रमाबाबत योग्य सूचना करणे.
**५)** नगर विकास विभागातील समिती महानगरपालिका/नगरपालिका अधिकार क्षेत्रात कृति आराखडयात ठरवून दिलेल्या कामांची अंमलबजावणी करील.
**६)** कृति आराखडयाची अंमलबजावणी करण्यासाठी निधी व कर्मचा-यांची उपलब्धता संबंधी महानगरपालिका/नगरपालिका त्यांच्या निधीमधून करतील.

**०३.** हा शासन निर्णय नगर विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे..

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,**

**(सु.व.चव्हाण)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**